महिला व बाल विकास विभागांतर्गत क्षेत्रिय आस्थापनेवरील उपआयुक्त या गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या प्रशासकीय कारणास्तव बदली करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
शासन आदेश क्रमांक : मबाआ-२०२४/प्र.क्र.३४/का.७
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दि.१५ मार्च,२०२४.

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हे दिनांक ०१ जुलै, २००६ पासून अमलात आले आहेत. सदर अधिनियमातील कलम ४(४) (दोन) व ४(५) मधील तरतुदीनुसार उपआयुक्त या गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या विशेष कारणास्तव बदलीस सक्षम प्राधिकारी यांच्या लगतपूर्व वरिष्ठ प्राधिकाऱ्यांनी दिलेल्या मान्यतेनुसार खालील तक्त्यात नमूद त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक- ३ मध्ये दर्शविल्यानुसार पदस्थापना करण्यात येत आहे.

| .क्र | अधिकाऱ्यांचे नाव, पदनाम व सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे पद व कार्यालय | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्रीम.एस.डी.लोंढे, उपआयुक्त (सनियंत्रण), एकात्मिक बाल विकास सेवा योजना आयुक्तालय, नवी मुंबई. | उपआयुक्त (आरोग्य व पोषण), एकात्मिक बाल विकास सेवा योजना आयुक्तालय, नवी मुंबई. | श्रीम.एस.डी.लोंढे यांनी सध्याचा पदाचा अतिरिक्त कार्यभार पुढील आदेशापर्यंत धारण करावा. |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. संबंधित अधिकाऱ्यांनी अन्य आदेशाची वाट न पाहता बदलीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होऊन त्याबाबतचा अहवाल आयुक्त,महिला व बाल विकास,पुणे, आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई व शासनास wcd-desk०७@gov.in या ई-मेल आयडी वर सादर करावा.

३. उपरोक्त अधिकाऱ्यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक, तसेच अंतिम वेतन प्रमाणपत्र बदली करण्यात आलेल्या नवीन कार्यालयाकडे तात्काळ पाठविण्यात यावे.

४. उपरोक्त अधिकाऱ्यांना पुर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करू नये वा महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने त्यांचा कोणत्याही प्रकारचा रजेचा अर्ज स्विकारू नये.

५. उपरोक्त अधिकारी यांना बदलीच्या पदावर रूजू करून घेताना, ते रजेवर /गैरहजर होते किंवा कसे याबाबतची खातरजमा त्यांना पदस्थापनेवर हजर करून घेणाऱ्या कार्यालयाने करावी. सदर अधिकारी वैद्यकीय कारणास्तव गैरहजर असतील तर त्यांना हजर करून घेण्यापूर्वी वैद्यकीय मंडळासमोर पाठवावे. जर अन्य रजेवर होते असे आढळल्यास त्यांचेकडून न चुकता तसा रजेचा अर्ज भरून घ्यावा आणि नंतर हजर करून घ्यावे. तसेच रजा संदर्भात शासनाने वेळोवेळी प्रसृत केलेल्या शासन निर्णय/परिपत्राकांतील निर्देशांचे पालन करावे.

६. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेततर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, उपरोक्त अधिकारी यांनी बदलीच्या ठिकाणी रूजू होण्याची दक्षता घ्यावी, अन्यथा या पदग्रहण अवधीत बदलीच्या ठिकाणी रूजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यादिन (dies non) म्हणून गणला जाईल.

७. उपरोक्त अधिकाऱ्यांच्या बदली ही प्रशासकीय कारणास्तव असल्याने त्यांना प्रवास भत्ता व इतर अनुषंगिक लाभ अनुज्ञेय राहणार आहेत.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१४१८३६२२६८३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VILAS RAMDAS THAKUR

Digitally signed by VILAS RAMDAS THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C8B1E52C5C4F922AB6EB7A0B44101C838AEA34F29FBFF0AEBE9D85C3DE3468C2, cn=VILAS RAMDAS THAKUR
Date: 2024.03.30 12:31:51 +05'30'

(वि.रा.ठाकूर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे.
२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई.
३. मा.मंत्री, (म.व बा.वि.वि.), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.सचिव, (म.व बा.वि.वि.), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. संबंधित विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास विभाग (आयुक्तालयामार्फत).
६. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/लेखापरीक्षा, मुंबई/नागपूर (आयुक्तालयामार्फत).
७. संबंधित अधिदान व लेखाधिकारी/जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालयामार्फत).
८. संबंधित अधिकारी (आयुक्तालयामार्फत).
९. निवडनस्ती (कार्यासन-७)